**समग्र शिक्षा या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत शिक्षक शिक्षण या योजनेसाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) लेखाशीर्षांतर्गत राज्य शासनाचा हिस्सा वितरीत करण्याबाबत.**
**(लेखाशीर्ष २२०२ आय ७५५)**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः डाएट-२०२३/प्र.क्र.२७/ प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १६ जून, २०२३

**वाचा -**

१) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल २०२३
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२३/प्र.क्र.६१/अर्थसंकल्प (विघयो) दि.१४ जून, २०२३

**प्रस्तावना-**

केंद्र पुरस्कृत समग्र शिक्षा अभियानांर्गत शिक्षक शिक्षण या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी.एन-३ मधील मुख्य लेखाशीर्ष २२०२, सर्वसाधारण शिक्षण ०१,प्राथमिक शिक्षण,७८९, विशेष घटक योजना,(०१) अनुसूचित जाती उपयोजना (०१) (०४) समग्र शिक्षा अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) कार्यक्रम लेखाशीर्ष २२०२आय ७५५ ०१-वेतन या उद्दिष्टामध्ये रु. ३७३.१८ लाख इतका निधी सन-२०२३-२०२४ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केला आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने अर्थसंकल्पित निधीतून ०१ वेतन या बाबीसाठी वित्त विभागाने २० टक्के मर्यादेत बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला रु.७४,६३,६००/- इतका निधी दि. १४ जून, २०२३ च्या शासन निर्णयान्वये वितरित केला आहे. सदर निधी क्षेत्रीय कार्यालयास उपलब्ध व खर्चास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून राज्य हिस्स्यापोटी रु.७४,६३,६००/- (रुपये चौऱ्याहत्तर लाख त्रेसष्ट हजार सहाशे फक्त) इतकी रक्कम खालीलप्रमाणे वितरित करण्यास व खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

| योजनेचे नाव | लेखाशीर्ष केंद्र/राज्य हिस्सा | बाब | सन २०२३-२४ मधील अर्थसंकल्पीय तरतूद | सदर शा.नि.वितरीत करण्यात येत असलेली तरतुद |
|---|---|---|---|---|
| समग्र शिक्षा अभियान (SCSP) (शिक्षक शिक्षण) | २२०२ आय ७५५ (राज्य हिस्सा ४० टक्के ) | ०१-वेतन | रु.३,७३,१८,०००/- | रु.७४,६३,६००/- |

२. उक्त खर्च मागणी क्र.एन-२, २२०२- सर्वसाधारण शिक्षण, (०१),प्राथमिक शिक्षण,७८९,अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना,(०१)अनुसूचित जाती उपयोजना (०१) (०४) समग्र शिक्षा अभियान (राज्य हिस्सा ४० टक्के) कार्यक्रम लेखाशीर्ष २२०२आय ७५५ खाली सन-२०२३-२०२४ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे याना

आहरण व संवितरण अधिकारी व राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर खर्च वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करून दिलेल्या निधीमर्यादेत व वित्त विभागाच्या १२ एप्रिल २०२३ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरून मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर वितरीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

५. हा शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२३/ प्र.क्र.६१/ अर्थसंकल्प (विघयो) दि.१४ जून, २०२३ नुसार दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१६१६४१०४२८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEHA NANDKUMAR HUMRASKAR

Digitally signed by NEHA NANDKUMAR HUMRASKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=fad9131f2c2ae9d6d9bb053715c4b9e08b15382beb01922a7bf2c233de3f7a45, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D597D0579F83EBCFE4417B54A6F0F51D17796B044C4649DF1D9A2A0E92B2B851, cn=NEHA NANDKUMAR HUMRASKAR
Date: 2023.06.16 16:43:00 +05'30'

**( नेहा हुमरसकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
६. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई.
७. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य,पुणे
१०. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
१२. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१३. सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (DIET)
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६.(व्यय-५/अर्थसंकल्प-वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
१७.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,अर्थसंकल्प(विघयो),मंत्रालय,मुंबई.
१८.निवडनस्ती (प्रशिक्षण).